सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम” या योजनेकरीता (४४०६०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- साववि-२०२३/प्र.क्र.५१/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१३ मार्च, २०२४

<u>वाचा</u>:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. ११-फ/५१.प्र.क्र/२०२३-साववि दिनांक ०३.०७.२०२३

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -साववि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दिनांक २८.०७.२०२३

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/३५९/२०२३-२४, दिनांक ०९.०८.२०२३.

५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ११.०८.२०२३ व दिनांक ११.१०.२०२३

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.१३/५३९/२०२३-२४, दिनांक ११.१०.२०२३ रोजीचे पत्र.

७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/५४९/२०२३-२४, दिनांक ११.१०.२०२३ रोजीचे पत्र.

८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/५७१/२०२३-२४, दिनांक १६.१०.२०२३ रोजीचे पत्र.

९) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३.१०.२०२३

१०)अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/६३२/२०२३-२४, दिनांक ०१.११.२०२३ रोजीचे पत्र

११) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक १०.११.२०२३

१२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/८८३/२०२३-२४, दिनांक ०४.०१.२०२४ रोजीचे पत्र.

१३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/८८४/२०२३-२४, दिनांक ०४.०१.२०२४ रोजीचे पत्र.

१४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०२.०२.२०२४

१५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४

१६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.१८/१११५/२०२३-२४, दिनांक १२.०३.२०२४ रोजीचे पत्र.

<u>**प्रस्तावना**</u>**:-**

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सन २०२३-२४ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)"** या राज्य योजनेंतर्गत रु.१०१७६८.८५ लक्ष इतका निधी (०२-मजूरी अंतर्गत रु.७६३२६.६४ लक्ष + २१-पुरवठा व सामग्री अंतर्गत रु.२५४४२.२१ लक्ष) (सुधारित अंदाज रु.८९०४८.०० लक्ष) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

०२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तिय वर्ष सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२३-२४ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२३ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्रमांक १५ येथील दिनांक ०५.०२.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये निधी वितरीत करण्याबाबत सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

०३. संदर्भाधीन क्रमांक ३ येथे नमूद दिनांक २८.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वनीकरण तसेच वन क्षेत्रातील मृद व जलसंधारणाची सर्व कामे ही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व वन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे अभिसरण करून घेण्यास व उर्वरित फरकाची रक्कम योजनेंतर्गत उपलब्ध तरतुदीमधून अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन कार्यक्रम" या योजनेंतर्गत करण्यात येणारी सर्व कामे सुध्दा अभिसरणांतर्गत करणे अभिप्रेत आहे. तथापि, सदर योजनांतर्गत रोपवनाच्या बांधील कामांकरीता चालू आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून निधी वितरीत करणे आवश्यक आहे.

०४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक १५ येथे नमूद दिनांक १२.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत "वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम", "महत्त्वाचे रस्ते/रेल्वे कालवे/दुतर्फा वृक्ष लागवड" आणि "महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकड्यांचे

हरितीकरण” या योजनेंतर्गत रोपवनाच्या बांधील कामांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात (००)(०६) “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत “वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम”, “महत्त्वाचे रस्ते/रेल्वे कालवे/दुतर्फा वृक्ष लागवड” आणि “महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकड्यांचे हरितीकरण” या योजनांतर्गत करण्यात येत असलेल्या बांधील कामांकरीता खालील तक्ता क्रमांक १,२ व ३ मध्ये नमूद केल्यानुसार योजनानिहाय व वन वृत्त/विभाग निहाय निधी वितरित व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| तक्ता क्रमांक -१ | | | | |
|---|---|---|---|---|
| योजनेचे नाव- वनिकरणाचा भरगच्च कार्यक्रम | | | | |
| अ.क्र. | वन वृत्ताचे नाव | वितरीत करावयाचा निधी (रु. लाखात) | | |
| | | ०२- मजुरी | २१- पुरवठा व सामग्री | एकूण |
| १ | पुणे | ००.०० | २३४.९८ | २३४.९८ |
| २ | गडचिरोली | ००.०० | १३९.०३ | १३९.०३ |
| ३ | नागपूर | ००.०० | २४०.७६ | २४०.७६ |
| ४ | चंद्रपूर | ००.०० | २६०.९७ | २६०.९७ |
| ५ | छत्रपती संभाजीनगर | ००.०० | ३४२.३५ | ३४२.३५ |
| ६ | नाशिक | ००.०० | ३०१.०० | ३०१.०० |
| ७ | धुळे | ००.०० | १६३.४७ | १६३.४७ |
| ८ | वन संरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प (TATR) | ००.०० | ३६.२५ | ३६.२५ |
| ९ | अमरावती (ANR) +(AR) | ००.०० | ३०३.३३ | ३०३.३३ |
| १० | वन संरक्षक तथा क्षेत्र संचालक मेळघाट व्याघ्र प्रकल्प अमरावती (MTR) | | ४१.०७ | ४१.०७ |
| ११ | यवतमाळ | ००.०० | ४७९.६५ | ४७९.६५ |
| १२ | कोल्हापूर | ००.०० | १८६.७८ | १८६.७८ |
| १३ | ठाणे | ००.०० | १३३.०२ | १३३.०२ |
| | **एकूण** | **००.००** | **२८६२.६६** | **२८६२.६६** |

| तक्ता क्रमांक -२ | | | | |
|---|---|---|---|---|
| **योजनेचे नाव-** महत्त्वाचे रस्ते/रेल्वे कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड | | | | |
| अ.क्र. | **वन वृत्ताचे नाव** | **वितरीत करावयाचा निधी (रु. लाखात)** | | |
| | | **०२- मजुरी** | **२१- पुरवठा व सामग्री** | **एकूण** |
| १ | पुणे | ००.०० | ६८४.०६ | ६८४.०६ |
| २ | छत्रपती संभाजीनगर | ००.०० | १११८.४५ | १११८.४५ |
| ३ | नाशिक | ००.०० | १०३०.८४ | १०३०.८४ |
| ४ | अमरावती | ००.०० | ६७०.९८ | ६७०.९८ |
| ५ | नागपूर | ००.०० | २९१.५९ | २९१.५९ |
| ६ | ठाणे | ००.०० | २०६.९९ | २०६.९९ |
| | **एकूण** | ००.०० | **४००२.९१** | **४००२.९१** |

| तक्ता क्रमांक -३ | | | | |
|---|---|---|---|---|
| **योजनेचे नाव-** "महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण" | | | | |
| अ.क्र. | **वन वृत्ताचे नाव** | **वितरीत करावयाचा निधी** (रु. लाखात) | | |
| | | **०२- मजुरी** | **२१- पुरवठा व सामग्री** | **एकूण** |
| १ | पुणे | ००.०० | २७.७७ | २७.७७ |
| २ | छत्रपती संभाजीनगर | ००.०० | ००.०० | ००.०० |
| ३ | नाशिक | ००.०० | २५.९३ | २५.९३ |
| ४ | अमरावती | ००.०० | १७.४५ | १७.४५ |
| ५ | नागपूर | ००.०० | २.७१ | २.७१ |
| ६ | ठाणे | ००.०० | ३.३५ | ३.३५ |
| | **एकूण** | ००.०० | **७७.२१** | **७७.२१** |

०२. उपरोक्त तक्ता क्रमांक १, २ व ३ मध्ये नमूद केल्यानुसार "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत "वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम", "महत्त्वाचे रस्ते/रेल्वे

कालवे/दुतर्फा वृक्ष लागवड” आणि “महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकड्यांचे हरितीकरण” या योजनांतर्गत करण्यात येत असलेल्या बांधील कामांकरीता अनुक्रमे रु.२८६२.६६ लक्ष, रु.४००२.९१ लक्ष व रु.७७.२१ लक्ष असा एकूण रु.६९४२.७८ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी हा संबंधित योजनांतर्गत करण्यात येत असलेल्या बांधील कामांकरीताच खर्च करण्यात यावा. तसेच सदर बांधील कामांना निधी वितरीत करतांना वन वृत्त/विभाग निहाय बांधील (प्रथम वर्ष, व्दितीय वर्ष, तृतीय वर्ष, चतुर्थ वर्ष व पंचम वर्ष) कामांचा तपशिल तपासूनच सदर निधी वितरीत करण्याची कार्यवाही अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून करण्यात यावी.

०३. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी तात्काळ वितरीत करून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. या योजनेंतर्गत करण्यात आलेल्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्यात आली आहे याबाबतची दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

०४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) हे वर्ष २०२३-२४ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील. तसेच सदर निधी वितरीत करतांना करण्यात येत असलेली कामे ही सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिलेल्या अंदाजपत्रकानुसार तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्याची खातरजमा प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे यांनी करावी. शासनाकडे निधी मागणीचा प्रस्ताव सादर करताना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त बाबी तपासल्याचे प्रमाणपत्र सोबत जोडावे.

०५. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२३-२४ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व १५ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०७. वन वृत्त/विभाग निहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२ ).**
**०२- मजूरी, २१- साहित्य व पुरवठा**

०९. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक १२.०४.२०२३ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१३१९३००७५५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2024.03.13 19:40:31 +05'30'

**(वि. बा. इंगळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)

६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती फ-११